**पिंपरी-चिंचवड महानगरपालिका**
**महानगरपालिकेच्या आस्थापनेवर "सह शहर अभियंता" (विद्युत/यांत्रिकी) या अभिनामाचे पद नव्याने निर्माण करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पीसीएम ३००८/१०२५/प्र.क्र.३३०/०८/नवि-२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- १० जुलै, २००८**

**वाचा :-** (१) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.प्रशा/१/कावि/४४२/२००८ दिनांक ३१/५/२००८ व त्यासोबतचा मनपा महासभा ठराव क्र.३४८, दिनांक २०/५/२००८ आणि परिशिष्ट "अ"
(२) शासन अधिसूचना क्र.पीसीसी ३०२००३/१८५/प्र.क्र.८०/०३/नवि-२२,दि.१२ एप्रिल,०७
(३) शासन प्रारुप अधिसूचना क्र.पीसीसी ३००७/१२६७/प्र.क्र.१७४/०७/नवि-२२, दिनांक ३० जानेवारी, २००८

**प्रस्तावना :--**

पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या क्षेत्रामध्ये सन १९९७ साली नव्याने १८ महसुली गावांचा समावेश झालेला आहे. तसेच सन २००१ च्या जनगणनेनुसार महापालिका क्षेत्राची लोकसंख्या १२ लाखाचे वर गेलेली आहे. या वाढत्या लोकसंख्येच्या गरजेनुसार नागरिकांना नागरी सुविधा देणे आवश्यक आहे. तसेच महापालिका क्षेत्राचा विकास सातत्याने करणे आवश्यक आहे. महापालिकेच्या कार्यक्षेत्रामध्ये सद्य:स्थितीमध्ये मोठया प्रमाणावर रस्ते, पाणीपुरवठा, भुयारी गटार योजना, आरोग्यविषयक य स्वरुपाची कामे चालू आहेत. तसेच नजिकच्या काळामध्ये प्रस्तावित आहेत. केंद्र शासनाच्या जेएनएनयुआरएम या योजनेअंतर्गत नव्याने मोठया प्रमाणावर निधी महापालिकेस प्राप्त होत आहे. या निधीमधून महापालिका क्षेत्रामध्ये नागरिकांना द्यावयाच्या अत्यावश्यक सुविधा याबाबतचे प्रकल्प कार्यान्वित आहेत. तसेच नजिकच्या काळात चालू करावयाचे आहेत. त्याकरिता महापालिका कामकाजासाठी नव्याने काही पदे निर्माण करणे आवश्यक आहे, असे महानगरपालिकेने नमूद केले आहे.

सद्यस्थितीमध्ये महापालिका पाणीपुरवठयाच्या चौथ्या टप्प्याची पंपींग मशिनरी तसेच बंद पाईपव्दारे पवना धरणातून पाणी आणण्यासाठी पंपींग मशिनरी उभारणे, भविष्यात ट्राम स्काय अथवा मेट्रोरेल तसेच महापालिकेमार्फत करण्यात येणारे विजनिर्मिती व त्याअनुषंगिक कामे, आरोग्य विभाग व अग्निशामक विभागासाठी घेण्यात येणारी अत्याधुनिक वाहने व त्यांची दुरुस्ती देखभाल करण्याकरिता सह शहर अभियंता (विद्युत/यांत्रिकी) या पदाची तातडीने महापालिकेसाठी आवश्यकता आहे. सदरचे पद महापालिका आस्थापनेवर निर्माण करण्यास महापालिका सभेने ठराव क्र.३४८, दिनांक २०/५/२००८ अन्वये मान्यता दिलेली आहे. सध्या महापालिकेचा सन २००७-०८ चा आस्थापना खर्च रु.१५९.५० कोटी (१६.५० टक्के) असा आहे. सदरचे पद महापालिकेध्मये भरल्यानंतर वार्षिक आस्थापना खर्चात सुमारे रु.३.६४ लाख (०.००३ टक्के) एवढी वाढ अपेक्षित आहे.

महापालिका सभेची मान्यता व महापालिकेच्या विकास कामांकरिता सदर पदाची असलेली आवश्यकता विचारात घेता प्रस्तावासोबतचे परिशिष्ट "अ"मध्ये नमूद केलेल्या शैक्षणिक अर्हतेमध्ये सह शहर अभियंता (विद्युत/यांत्रिकी) या अभिनामाचे एकमेव पद रु.१२०००-३७५-१६५०० या वेतनश्रेणीमध्ये नव्याने निर्माण करण्यास शासनाची मान्यता मिळावी असा प्रस्ताव आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे. जेएनएनयुआरएम योजना राबवित असताना अन्य महानगरपालिकेत या योजनेच्या अंमलबजावणीसाठी काही पदे नव्याने निर्माण करण्यास शासनाने मान्यता दिली आहे उदा:- नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका, ठाणे महानगरपालिका व पुणे महानगरपालिकेत ५ वरिष्ठ अधिकारी प्रतिनियुक्तीने उपलब्ध केले आहेत. जेएनएनयुआरएम योजनेचे महत्व व ही योजना राबविण्याची गरज, महानगरपालिकेस नजिकच्या काळात कार्यान्वीत करावयाचे प्रकल्प या महानगरपालिकेच्या मागील काही वर्षांत ३५ टक्क्यापेक्षा खूपच कमी असलेला आस्थापना खर्च, महानगरपालिकेची झालेली हद्दवाढ इत्यादी बाबी तसेच आयुक्तांची मागणी विचारात घेवून सदर प्रकरणीच्या आयुक्तांच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :--**

आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी महासभा ठराव क्रमांक ३४८, दिनांक २०/५/२००८ नुसार प्रस्तावित केल्याप्रमाणे या महापालिकेच्या आस्थापनेवर "**सह शहर अभियंता (विद्युत/यांत्रिकी)**" या अभिनामाचे/संवर्गातील रु.१२०००-३७५-१६५०० या वेतनश्रेणीत एक पद नव्याने निर्माण करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम ५१(४) अन्वये या आदेशाव्दारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. या पदाची शैक्षणिक अर्हता व भरतीची पध्दत खालील प्रमाणे राहील.

| अ.क्र. | पदाचे नाव व वेतनश्रेणी | पद संख्या | अर्हता | भरतीची पध्दत | भरतीचे प्रमाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | **सह शहर अभियंता (विद्युत/यांत्रिकी)** रु.१२०००-३७५-१६५०० | १ | पिंपरी-चिंचवड मनपाच्या आस्थापनेवरील कार्यकारी अभियंता विद्युत या पदावर काम करणा-या अधिका-यांमधून की ज्यांना विद्युत तसेच पाणीपुरवठा पंपिंग मशिनरी यांत्रिकी विभाग व वाहन दुरुस्ती कार्यशाळेकडील कामकाज या प्रत्येक क्षेत्रात किमान पाच वर्षाचा अनुभव असणे आवश्यक | मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील तरतुदीनुसार | १०० टक्के पदोन्नतीने |

०३. सदर आदेशानुषंगाने सर्व संविधानिक बाबींची पूर्तता आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी पूर्ण करुन अनुपालन अहवाल शासनास पाठवावा.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,**

१०/१०/०८

**( सुनील कोठेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

(२) मा.सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

(३) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे.

(४) निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई